**महाराष्ट्र राज्यात उद्योगांना चालना देण्याकरीता तसेच सुरू असलेल्या उद्योगांच्या समस्यांचे निराकरण करणेसाठी अभ्यास समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी २०२४/ प्र.क्र. २५३/उ-१४.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई.- ४०००३२.
दिनांक :- ३० मे, २०२४.

**संदर्भ :-** सह सचिव, मा. मुख्य सचिव कार्यालय यांची दि. १४/५/२०२४ रोजीची कार्यालयीन टिपणी.

**प्रस्तावना:-**

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. २९/४/२०२४ रोजी झालेल्या उद्योग विभागाच्या शक्ती प्रदान समितीच्या बैठकी दरम्यान महाराष्ट्र राज्यात उद्योगांना चालना देण्याकरीता तसेच सुरू असलेल्या उद्योगांच्या समस्यांच्या निराकरणाबाबत चर्चा करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या चर्चेनुसार अभ्यास समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्यात उद्योगांना चालना देण्याकरीता तसेच सुरू असलेल्या उद्योगांच्या समस्यांच्या निराकरणाबाबत खालीलप्रमाणे अभ्यास समितीची स्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सदस्य |
|---|---|---|
| १. | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई अथवा त्यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ३. | सह मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रशासन), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई. | सदस्य |
| ४. | जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे | सदस्य |
| ५. | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई. | सदस्य |
| ६. | संचालक, नगररचना आणि मूल्य निर्धारण विभाग, पुणे. | सदस्य |

२. **सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.**

अ) उपलब्ध औद्योगिक भूखंडाची माहिती Online Real Time स्वरूपात पोर्टलवर उपलब्ध करून देणे.
ब) वापरात नसलेल्या औद्योगिक भूखंडाचा वापर करणे / पुन्हा ताब्यात घेऊन त्यांचे पुर्नवाटप करणे.
क) एमआयडीसी बाहेरील औद्योगिक समूहांना पायाभूत सुविधा पुरविणे.
ड) राज्यातील उद्योगांना भेडसावणाऱ्या विविध उपद्रवी घटकांचा बंदोबस्त करण्यासाठी

उपाययोजना सुचविणे.

ई) औद्योगिक क्षेत्रालगतच्या जागेवर रहिवास वापर अनुज्ञेय करणे.

इ) उद्योगांच्या सहकार्याने राज्यातील बेरोजगार युवकांना उद्योगांशी संबंधित कौशल्य प्रशिक्षण देणे.

३. सदर समितीने आपला अहवाल दि. १० जून, २०२४ पर्यंत मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५३०१३४९०६८८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2024.05.30 14:54:36 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,
२) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक.
४) सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सह मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रशासन), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे.
८) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
९) संचालक, नगररचना आणि मूल्य निर्धारण विभाग, मुंबई.
१०) निवडनस्ती (उद्योग-१४)